**विशाल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि., उस्मानाबाद, ता. व जि. उस्मानाबाद या संस्थेस राष्ट्रीय सहकारी विकास योजनेअंतर्गत रा.स.वि.नि. कर्ज, रा.स.वि.नि. भागभांडवल व शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: प्रक्रिया-१११२/प्र.क्र.२३७/१-स**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दि. १४ डिसेंबर, २०१८

**वाचा:-**

१) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग क्र: प्रक्रिया-११२००४/ प्र.क्र. १६२(अ)/९-स, दि. १२.१०.२००७.

२) रा.स.वि.नि. नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NCDC:३-२९/२०१२-FG/१९३/SA२००८८, दि. १८.०७.२०१२

३) शासन निर्णय क्र. प्रक्रिया-११२०१४/प्र.क्र.४६/९-स, दि.०१.०७.२०१४

४) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक:- अर्थसं:-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

५) पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.पणन-२/कृउप्र/ विशाल ॲग्रो /त्रृटीपुर्तताअ/२०१८/२४२१, दि. २०.०६.२०१८

६) पणन संचालक, पणन संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.जा.क्र.पणन-२/कृउप्र/ विशाल ॲग्रो /उर्वरितअप्र/२०१८/३१८८ दि. ३०.०८.२०१८

**प्रस्तावना:-**

विशाल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि., उस्मानाबाद, ता. व जि. उस्मानाबाद या संस्थेमार्फत **डाळ प्रक्रिया** करण्याचा प्रकल्प उभारण्यात येत असून, राज्यातील शेतकऱ्यांनी उत्पादित केलेल्या शेतमालाला योग्य भाव मिळावा म्हणून सहकारी संस्थांना १:९ या प्रमाणात शासकिस भागभांडवल देण्याबाबत मंत्रिमंडळाने घेतलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने या प्रकल्पाची वित्तीय सहाय्यासाठी राष्ट्रीय सहकारी विकास निगमाकडे शिफारस करण्यात आलेली होती. राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने त्यांच्या दि. ०८.०६.२०१२ च्या पत्रान्वये सदर प्रकल्पाच्या खालील आकृतीबंधानुसार किंमत रु. ३४०.०० लाख इतके अर्थसहाय्य मंजूर केले आहे.

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशिल | टक्केवारी | आर्थिक आकृतिबंध |
|---|---|---|---|
| १ | राज्य शासनाच्या हमीवर रा.स.वि.न. किंवा इतर वित्तीय संस्थेकडून कर्ज | ६०% | २०४.०० |
| २ | रा.स.वि.नि. भागभांडवल | ३०% | १०२.०० |
| ३ | राज्य शासनाचे भागभांडवल | ०६% | २०.४० |
| | **एकूण:-** | **९६%** | **३२६.४०** |
| ४ | संस्थेचे स्वभागभांडवल | ०४% | १३.६० |
| | **एकूण:-** | **१००%** | **३४०.००** |

वरील आकृतीबंधानुसार संस्थेने जमा करावयाची आपल्या हिश्याची रक्कम रु. १३.६० लाख पूर्णपणे जमा केली आहे. संस्थेस वाचा मधील **संदर्भ क्र.३ द्वारे शासन निर्णय दि. ०१.०७.२०१४** अन्वये रा.स.वि.नि. कर्ज रु. ५१.०० लाख, रा.स.वि.नि. भागभांडवल रु. ५१.०० लाख, शासकिय भागभांडवल रु. १०.२० लाख असे एकूण रु. ११२.२० लाख इतके अर्थसहाय्य वितरित करण्यात आलेले आहे. सद्यस्थितीस संस्थेस रा.स.वि.नि. कर्ज रु. १५३.०० लाख, रा.स.वि.नि. भागभांडवल रु. ५१.०० लाख व शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) रु. १०.२० लाख असे एकूण रु. २१४.२० लाख इतके अर्थसहाय्य वितरित करणे बाकी आहे. त्यानुसार या संस्थेस पुढील अंतिम टप्प्यातील अर्थसहाय्य वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत शासन खालीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय:-**

या शासन निर्णयाद्वारे विशाल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि., उस्मानाबाद, ता. व जि. उस्मानाबाद या संस्थेस उपरोक्त आकृतीबंधात दर्शविण्यात आल्यानुसार **रा.स.वि.नि. कर्जाच्या पुढील हप्त्यापोटी रा.स.वि.नि. कर्ज (६४२५०३१३) या लेखाशिर्षखाली रू.१,३१,००,०००/-(रु. एक कोटी एकतीस लाख), रा.स.वि.नि. भागभांडवल (४४२५०२९४) रू. ५१,००,०००/- (रु. एक्कावन्न लाख), शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) (४४२५०७५९) या लेखाशिर्षखाली रू. १०,२०,०००/-(रु. दहा लाख वीस हजार)** वितरित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

**०२.** कर्जाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती राष्ट्रीय सहकारी विकास निगमाच्या दि. १८.०७.२०१२ रोजीच्या मंजूरी आदेशाप्रमाणे राहतील. शासकिय भागभांडवलाच्या परतफेडीच्या अटी व शर्ती शासन निर्णय दि.१२.१०.२००७ नुसार राहतील. तसेच संस्थेस आतापर्यंत मंजूर झालेल्या रकमेएवढया किंमतीच्या संस्थेची मालमत्ता तारण ठेवण्याबाबतचे करारपत्र संस्थेकडून करुन घेणे आणि संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या रक्कमेच्या २० टक्के इतक्या रक्कमेची संचालकाकडून वैयक्तिक मालमत्तेचा तारण गहाण लिहून घेणे बंधनकारक राहिल. त्याशिवाय सदर मंजूर अर्थसहाय्य वितरित करण्यात येऊ नये.

**०३.** या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या उक्त रकमांचे आहरण करुन वरील परिच्छेद ०२ वरील अटींची पूर्तता करुन विशाल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि., उस्मानाबाद, ता. व जि. उस्मानाबाद या संस्थेला अर्थसहाय्य वितरित करण्याकरिता लेखाधिकारी, पणन संचालक कार्यालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. या शासन निर्णयाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या स्वतंत्र लेखाशीर्षाखालील रकमा जिल्हा कोषागार अधिकार, पुणे येथून आहरित करुन संस्थेस वितरित करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांनी करावी. त्यास अनुसरुन **रा.स.वि.नि. कर्ज (६४२५०३१३) या लेखाशिर्षखाली रू.१,३१,००,०००/-(रु. एक कोटी एकतीस लाख ), रा.स.वि.नि. भागभांडवल (४४२५०२९४) रू. ५१,००,०००/- (रु. एक्कावन्न लाख ), शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) (४४२५०७५९) या लेखाशिर्षखाली रू. १०,२०,०००/-(रु. दहा लाख वीस हजार)** इतक्या रकमांचे स्वतंत्र धनादेश ,

**“विशाल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि., उस्मानाबाद, ता. व जि. उस्मानाबाद”**

“VISHAL AGRO PROCESSING COOPERATIVE SOCIETY LTD., OSMANABAD, TALUKA AND DISTRICT OSMANABAD.”

च्या नांवाने वितरित करण्यात यावा.

०४.  विशाल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि., उस्मानाबाद, ता. व जि. उस्मानाबाद या संस्थेस शासनाच्या व निगमाच्या भागभांडवलाच्या/कर्जाच्या नेहमीच्या अटी व शर्ती (त्यात काही सुधारण/बदल असल्यास त्यासह) बंधनकारक राहतील.

०५.  वरीलप्रमाणे मंजूर केलेला खर्च

**अ)** रा.स.वि.नि. कर्ज (६४२५ ०३१३) या लेखाशिर्षखाली रू.१,३१,००,०००/-(रु. एक कोटी एकतीस लाख) चा खर्च "मागणी क्र. व्ही.-५,६४२५- सहकारीसाठी कर्जे, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांना कर्जे, (०२) सहकारी प्रक्रिया संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०२)(०१) सहकारी शेतीमाल संस्थांना कर्जे (राष्ट्रीय सहकारी विकास महामंडळ) (६४२५०३१३) ५५- कर्जे व आगाउ रकमा" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**ब)** रा.स.वि. नि. भागभांडवल (४४२५ ०२९४) या लेखाशिर्षाखाली रू.५१,००,०००/- (रु.एक्कावन्न लाख ) चा खर्च "मागणी क्र. व्ही.-३,४४२५- सहकारावरील भांडवली खर्च, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका, (०२) सहकारी संस्करण संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत- योजना, राज्य योजनांतर्गत योजना (००)(०२) कृषि संस्करण संस्थेला (राष्ट्रीय सहकार विकास महामंडळ) (४४२५ ०२९४)-३२- अंशदाने" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**क)** शासकीय भागभांडवल (कोल्हे कमिटी) (४४२५ ०७५९) या लेखाशिर्षाखाली रू. १०,२०,०००/- (रु. दहा लाख वीस हजार )चा खर्च "मागणी क्र. व्ही.-३,४४२५- सहकारावरील भांडवली खर्च, (००)(१०८) इतर सहकारी संस्थांमधील गुंतवणूका, (०२) सहकारी संस्करण संस्था पंचवार्षिक योजनांतर्गत- योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२)(०८) कृषि प्रक्रिया संस्थांना भागभांडवली अंशदान संस्थेला (कोल्हे कमिटी) (राज्य योजना) (४४२५ ०७५९)-३२- अंशदाने" या लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०६.  सदरच्या रकमेचा विनियोग संस्था आवश्यक त्याच बाबींकरिता करीत आहे. याबाबतचे नियंत्रण पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी ठेवावे व याबाबतचा अहवाल शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा. त्याचप्रमाणे पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, उस्मानाबाद यांनी संस्थेच्या कामकाजावर आणि प्रकल्प उभारणीवर लक्ष ठेवावयाचे आहे. संस्थेच्या कामाच्या प्रगतीचा तिमाही अहवाल जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, उस्मानाबाद यांनी पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावा. पणन संचालक यांनी सदर अहवाल तपासून परस्पर राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली व क्षेत्रीय कार्यालय, पुणे यांना न चुकता दर तीन महिन्यानंतर सादर करावा. जेणेकरुन निगमाकडून शासनास रक्कमेची प्रतिपूर्ती लवकारात लवकर होऊ शकेल. जर या कामी संस्थेकडून कुचराई झाल्यास एकरकमी अर्थसहाय्याची रक्कम वसूल करण्याचे अधिकार शासनाकडे राहतील. संस्थेचा प्रकल्प विहित मुदतीत पूर्ण करण्याबाबत संस्थेने योग्य ती काळजी घ्यावी.

०७.  या प्रकल्प खर्चामध्ये वाढ झाल्यास सदर वाढीव किंमत संस्थेने स्वबळावर उभी करावयाची आहे. वाढीव प्रकल्प किंमतीमध्ये शासनाच्या कोणताही अर्थसहाय्याचा सहभाग असणार नाही, याची संस्थेने नोंद घ्यावी.

०८.  राज्य शासनामार्फत संस्थेस दिल्या जाणा-या भाग-भांडवलाची परतफेड योग्य प्रकारे होण्याचे दृष्टीने संबंधित संस्थेची मालमत्ता व संचालक मंडळाच्या सदस्याची सदर हप्त्याच्या २०% रकमेची वैयक्तिक मालमत्ता संस्थेने शासनाकडे तारण ठेवणे बंधनकारक असून, त्याशिवाय संस्थेस मंजूर प्रकल्पांतर्गत

अर्थसहाय्य वितरित करण्यात येऊ नये. या अटीची पूर्तता झाली किंवा नाही याची खात्री पणन संचालक यांनी केल्यानंतर निधी वितरित करण्यात यावा.

**०९.** महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, नियम १४८ व १५३ अन्वये शासनाने दिलेली कर्जे व त्यावरील व्याजाची वेळचेवेळी वसुली नियमितपणे केली जात आहे व त्या सरकारी लेख्यात यथोचितरित्या जमा केल्या जात आहेत. यावर संनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी विभागीय नियंत्रक अधिका-याची आहे. तसेच दिलेल्या कर्जासंबंधीचे अभिलेख संकलित करणे, लेखे अद्ययावत ठेवणे आणि त्या संदर्भातील इतर आवश्यक कार्यवाही करणे ही जबाबदारी देखील संबंधित नियंत्रक अधिका-याची आहे. या संदर्भातील सुचना वित्त विभागामार्फत यापूर्वीच देण्यात आल्या आहेत.

**१०.** हे आदेश वित्त विभागाचे वाचामधील क्रमांक ४ मध्ये उल्लेख केलेल्या शासन परिपत्रकाद्वारे प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारानुसार तसेच अनौपचारीक संदर्भ क्र.६५१/२०१८/व्यय-२, दि.०७.१२.२०१८ अन्वये मान्यता दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

**११.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१४१५४००८७३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jaiprakash
Mansaramji
Ambade

Digitally signed by Jaiprakash Mansaramji Ambade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Cooperative Marketing, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ce079d77649e3080d74540a4a9ae7f6502ac7e6273891f24ffda6ebea493dce, serialNumber=d214bfebdf948d521ecc91e9cb1487d0cce508098bc2232154c36daba7635819, cn=Jaiprakash Mansaramji Ambade
Date: 2018.12.14 15:47:20 +05'30'

**( ज.म. अंबादे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

०१. मा. राज्यपाल महोदय यांचे प्रधान सचिव
०२. मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव
०३. मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
०४. मा.राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव
०५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र राज्य,
०६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य,
०७. महालेखापाल-१ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
०८. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
०९. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
१०. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
११. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१४. व्यवस्थापकिय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ४, सिरी इन्स्टिटयुशनल एरिया, हौज खास, नवी दिल्ली- ११००१६.
१५. प्रादेशिक संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५, बी.जे.रोड, पुणे-१.

१६. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१७. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१८. कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (कार्या.१४३१) मंत्रालय, मुंबई.
१९. कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-२)/(अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, पुणे.
२०. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, उस्मानाबाद.
२१. लेखाधिकारी, पणन संचालनालय, म.रा. पुणे-१.
२२. कार्यासन अधिकारी (१७-स), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२३. कार्यासन अधिकारी (२१-स), सहकार, पणन व वस्त्रोदयोग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२४. अध्यक्ष, “विशाल ॲग्रो प्रोसेसिंग को-ऑप. सोसायटी लि., उस्मानाबाद, ता. व जि. उस्मानाबाद”
२५. निवडनस्ती (१-स).

**********************************